201003081925200l

**अर्थसंकल्पीय अनुदान सन २००९-२०१०**

३६०४ - स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. १०१, जमीन महसूल (एक) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ व मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ अन्वये जिल्हा परिषद व पंचायत समिती व ग्रामपंचायतींना जमीन महसूल, जमीन समानीकरण व उपकर अनुदान इत्यादी संबंधात अभिहस्तांकित रकमा देणे (३६०४०४७९). मागणी एल-०५

**ग्राम पंचायतींना जमीन महसूल अनुदाने**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. बीजीटी २६०९/प्र.क्र. ६६/पंरा-४(२२)
मंत्रालय, मुंबई - ४०००३२ दिनांक - ५ मार्च, २०१०

वाचा - १) शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्र. व्हीपीएम १३७८/१२६७/सीआर ११६३/२४, दिनांक २२.४.१९९२

२) शासन निर्णय समक्रमांक दि. १६ जुलै,२००९.

३) शासन निर्णय समक्रमांक दि. ७ डिसेंबर, २००९.

**शासन निर्णय :-**

मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ च्या कलम १३१ व १३२ (अ) मधील तरतुदीनुसार ग्रामपंचायतींना जमीन महसूल व जमीन समानीकरण अनुदाने वितरीत करण्याबाबतची सुधारीत कार्यपध्दती शासनाचे दिनांक २२ एप्रिल १९९२ च्या शासननिर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरिता ग्रामपंचायतींना जमीन महसूल अनुदान (३६०४०४७९ ) या अनुदानाकरिता रुपये ६,०९,५७,०००/- ( रुपये सहा कोटी नऊ लाख सत्तावन्न हजार फक्त ) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यांत आली आहे.

२. सदर तरतुदीपैकी संदर्भीय शासन निर्णय दिनांक १६ जुलै, २००९ अन्वये रक्कम रु.२,०३,१९,०००/- (रुपये दोन कोटी तीन लक्ष एकोणीस हजार फक्त ) व संदर्भीय शासन निर्णय दिनांक ७ डिसेंबर, २००९ अन्वये रक्कम रु.२०५.२२( रुपये दोन कोटी पाच लक्ष बावीस हजार फक्त) अशी एकूण रुपये ४०८.४१ लक्ष एवढी तरतूद ग्रामपंचायतींना जमीन महसूल अनुदान देण्यासाठी विभागीय आयुक्तांकडे संबंधित जिल्हाधिका-यांना ग्रामपंचायतींना जमीन महसूल अनुदान मंजूर करणे शक्य व्हावे म्हणून सुपूर्द करण्यात आली आहे. उर्वरित अनुदान या शासन निर्णयान्वये रक्कम

रु.२,०१,१६,०००/- ( रुपये दोन कोटी एक लक्ष सोळा हजार फक्त) एवढी तरतूद ग्रामपंचायतींना जमीन महसूल अनुदान देण्यासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे विभागीय आयुक्तांकडे संबंधित जिल्हाधिका-यांना ग्रामपंचायतींना जमीन महसूल अनुदान मंजूर करणे शक्य व्हावे म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

| अ. क्र. | विभागाचे नाव | प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यांत येत असलेली रक्कम | |
|---|---|---|---|
| | | अंकी(रुपये लाखात ) | रुपये अक्षरी |
| १ | २ | ४ | ५ |
| १ | कोकण विभाग | २८.४४ | (रुपये अठ्ठावीस लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त ) |
| २ | नाशिक विभाग | ६३.०७ | (रुपये त्रेसष्ट लक्ष सात हजार फक्त ) |
| ३ | पुणे विभाग | ४९.२४ | (रुपये एकोण पन्नास लक्ष चोवीस हजार फक्त ) |
| ४ | औरंगाबाद विभाग | २६.४३ | (रुपये सव्वीस लक्ष त्रेचाळीस हजार फक्त ) |
| ५ | अमरावती विभाग | १८.२१ | (रुपये अठरा लक्ष एकवीस हजार फक्त ) |
| ६ | नागपूर विभाग | १५.७७ | (रुपये पंधरा लक्ष सत्याहत्तर हजार फक्त ) |
| | एकूण | २०१.१६ | (रुपये दोन कोटी एक लक्ष सोळा हजार फक्त ) |

३. विभागीय आयुक्तांनी या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली अनुदाने संबंधित जिल्हाधिका-यांकडे ग्रामपंचायतींना मंजूर करण्यासाठी त्वरित सूपूर्द करावी व वाटप केलेल्या आदेशांच्या प्रती शासनाकडे पाठवाव्यात. जिल्हाधिकारी यांनी निर्णयात मंजूर केलेल्या तरतुदीपेक्षा जादा खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

४. खर्चाचा मेळ घालण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्तांना पाठवावीत. विभागीय आयुक्तांनी त्या खर्चाचे महालेखापाल महाराष्ट्र १ व २ मुंबई / नागपूर या कार्यालयाशी ताळमेळाचे काम करावे व त्याबाबतचा अहवाल शासनाकडे पाठवावा.

५. यासाठी होणारा खर्च " ३६०४" स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०१ जमीन महसूल २९ भरपाई ,(०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदा , पंचायत समित्या अधिनियम १९६१ व मुंबई ग्रामपंचायत अधिनियम ,१९५८ अन्वये जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींना जमीन महसूल, जमीन समानीकरण व उपकर अनुदान इत्यादी संबंधात अभिहस्तांकित रकमा देणे ( ३६०४०४७९)(दत्तमत )-(योजनेतर ) ( मागणी क्र. एल -५ ) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हे अनुदान शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्देशित केलेल्या विहित अटी व शर्तींच्या अधीन राहील.

७. ह्या निधी ज्या प्रयोजनांसाठी देण्यात येतो त्या प्रयोजनासाठीच खर्च करण्यात यावा यांची दक्षता घेण्यात यावी. तसेच वितरित निधीच्या खर्चाचा तपशील दिनांक २९ मार्च, २०१० पर्यन्त शासनास निश्चितपणे सादर करावा. सदर अनुदान विहित कालावधीत खर्च न झाल्यास संबंधितांना जबाबदार धरण्यात येईल याची कृपया नोंद घ्यावी.

८. ह्या शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक - १४७/अर्थ -१७, दि. १६/०२/२०१० व अनौ.संदर्भ क्रमांक - ६६/१० / व्यय-१५, दि. १८/०२/२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( प्र. वि. पाटील )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति.

१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) जिल्हाधिकारी (सर्व )
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्यलेखा व वित्त अधिकारी
७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ , मुंबई (लेखापरिक्षा ) ( ५ जादा प्रतीसह )
९) महालेखापाल , महाराष्ट्र -१, मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता )( ५ जादा प्रतीसह )
१०) महालेखापाल . महाराष्ट्र -२, नागपूर (लेखा परिक्षा ) ( ५ जादा प्रतीसह)
११) महालेखापाल . महाराष्ट्र -२, नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता )( ५ जादा प्रतीसह )
१२) उप मुख्यलेखापरिक्षा,स्यानिकनिधीलेखा,कोकण(वाशी /पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर )
१३) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी , नवी मुंबई
१४) महसूल व वन विभाग
१५) वित्त विभाग. कार्या .(व्यय -१५) व (अर्थसंकल्प -१६)
१६) कार्यासन अधिकारी , ग्राम विकास व जलसंधारण विभाग (का.क्र. वित्त-१, वित्त -७, वित्त -८ )
१७) निवड नस्ती (का.क्र. २२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग